**ग्रंथालय संचालनालयाच्या अधिपत्याखालील गट-अ आणि गट-ब (राजपत्रित) सहाय्यक ग्रंथालय संचालक/ग्रंथपाल पदे पदोन्नतीने भरण्यासाठी विभागीय पदोन्नती समिती गठीत करणेबाबत.......**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. मराग्रं -२५११/प्र.क्र.१९०/२०१३/साशि-५,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक : १४ जानेवारी, २०१५**

**प्रस्तावना :** ग्रंथालय संचालनालय व त्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य ग्रंथालय सेवा गट-अ आणि गट ब (राजपत्रित), ग्रंथपाल/ सहाय्यक ग्रंथालय संचालक/ हस्तलिखित अधिकारी/ जिल्हा ग्रंथालय अधिकारी या संवर्गातील पदे पदोन्नतीने भरण्यासाठी विभागीय पदोन्नती समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :** ग्रंथालय संचालनालयाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य ग्रंथालय सेवा गट-अ आणि गट ब (राजपत्रित) ग्रंथपाल/सहाय्यक ग्रंथालय संचालक/हस्तलिखित अधिकारी या संवर्गातील पदे पदोन्नतीने भरण्याकरीता खालीलप्रमाणे विभागीय पदोन्नती समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १ | अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव उच्च व तंत्रशिक्षण विभाग मंत्रालय | अध्यक्ष |
| २ | सह सचिव/उप सचिव (ग्रंथालये) उच्च व तंत्रशिक्षण विभाग मंत्रालय | सदस्य |
| ३ | संचालक ग्रंथालय संचालनालय महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| ४ | मागासवर्गीय अधिका-यांचे प्रतिनिधी (उच्च व तंत्रशिक्षण विभाग मंत्रालयांतील गट अ संवर्गातील अधिकारी) | सदस्य |

२. शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी पदोन्नती देण्याच्या संदर्भात निर्गमित केलेल्या आदेशातील तरतूदी तसेच पदांचे सेवाप्रवेश नियम, कर्मचा-यांची/अधिका-यांची अद्ययावत सेवाजेष्ठता सूची, अद्ययावत गोपनीय अहवाल, शासनाने विहीत केलेली बिंदू नामावली इत्यादी बाबी विचारात घेऊन सदर विभागीय पदोन्नती समितीचे कार्य सुरु राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११४१६१९४०७४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shaila Dilip Targepatil

Digitally signed by Shaila Dilip Targepatil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shaila Dilip Targepatil
Date: 2015.01.16 15:35:21 +05'30'

**( शैला तारगे-पाटील )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक ग्रंथालय संचालनालय महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सचिव महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राद्वारे)
३. सामान्य प्रशासन विभाग मंत्रालय, मुंबई
४. मा. प्रधान सचिव उच्च व तंत्रशिक्षण विभाग मंत्रालय यांचे स्विय साहाय्यक
५. विभागीय पदोन्नती समितीचे संबंधित सदस्य
६. निवड नस्ती/साशि ५